**पवई तलावाच्या परिसरामध्ये होत असलेल्या अनधिकृत बांधकामाबाबत राज्य वेटलँड प्राधिकरणास अहवाल सादर करण्यासाठी तज्ञ समिती गठीत करणेबाबत...**



**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०२१/प्र.क्र.४१/तां.क.३**
१५ वा मजला, नवीन प्रशासन भवन,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १२ ऑक्टोबर, २०२१.

**परिपत्रक**

<u>वाचा</u> :- १) वेटलँड (संवर्धन व व्यवस्थापन) नियम, २०१७ मधील नियम ५ (४) नुसार गठीत राज्य वेटलँड प्राधिकरणाच्या दि.२६.८.२०२१ रोजी आयोजित बैठकीचे इतिवृत्त.

**<u>प्रस्तावना:-</u>**

केंद्रीय वने व पर्यावरण मंत्रालयाच्या वेटलँड (संवर्धन व व्यवस्थापन) नियम, २०१७ मधील नियम ५ (४) नुसार गठित राज्य वेटलँड प्राधिकरणाची तिसरी बैठक दि. २६.८.२०२१ रोजी आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीचे इतिवृत्त दि. २३.९.२०२१ रोजीच्या पत्रान्वये सर्व संबंधितांना पाठविण्यात आलेले आहे.

२. सदर बैठकीमध्ये नॅशनल वेटलँड ॲटलास मध्ये पाणथळ जागा म्हणून समाविष्ठ असलेल्या पवई तलावाच्या परिसरामध्ये बांधकाम होत असलेबाबत वनशक्ती संस्थने केंद्रिय पर्यावरण, वने व वातावरणीय बदल मंत्रालयाकडे दाखल केलेली तक्रार व त्यानुषंगाने करावयाच्या कार्यवाहीबाबतचा विषय चर्चेला ठेवण्यात आला होता. त्यानुसार या प्रकरणी राज्य वेटलँड प्राधिकरणास अहवाल सादर करण्यासाठी मा. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांच्या अध्यक्षतेखाली तज्ञ समिती गठित करण्याचा निर्णय घेण्यात आला होता. त्यानुसार तज्ञ समितीचे गठन करणे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन परिपत्रक :-**

नॅशनल वेटलँड ॲटलास मध्ये पाणथळ जागा म्हणून समाविष्ठ असलेल्या पवई तलावाच्या परिसरामध्ये बांधकाम होत असलेबाबत वनशक्ती संस्थने केंद्रिय पर्यावरण, वने व वातावरणीय बदल मंत्रालयाकडे दाखल केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने राज्य वेटलँड प्राधिकरणास अहवाल सादर करण्याकरिता खालीलप्रमाणे तज्ञ समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव, पर्यावरण व वातावणीय बदल विभाग. | अध्यक्ष |
| २. | श्री. राकेश कुमार, संचालक, निरी, नागपूर. | सदस्य |
| ३. | श्री. दिपक आपटे, बीएनएचएस, मुंबई | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ४. | श्री. प्रमोद साळस्कर | सदस्य |
| ५. | श्री. कुरुश दलाल | सदस्य |
| ६. | जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर, मुंबई. | सदस्य सचिव |

४. राज्य वेटलँड प्राधिकरणाच्या बैठकीमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयानुसार उपरोक्त तज्ञ समितीने पवई तलावाच्या परिसरामध्ये होत असलेल्या बांधकामाबाबत वनशक्ती संस्थने केंद्रिय पर्यावरण, वने व वातावरणीय बदल मंत्रालयाकडे दाखल केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने आपला अहवाल दि. १५.११.२०२१ पर्यंत राज्य वेटलँड प्राधिकरणास सादर करणे बंधनकारक राहील. सदर समितीने आपला अहवाल राज्य वेटलँड प्राधिकरणास सादर केल्यानंतर तज्ञ समितीचा कार्यकाळ आपोआप संपुष्टात येईल.

५. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११०१३१४५३५३५१०४ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ABHAY MADHUKAR PIMPARKAR

Digitally signed by ABHAY MADHUKAR PIMPARKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=720ac43a3067c02d33a528e0f6199f1af9e95d4d6f4238a122280868dfb3a774, pseudonym=91B3CF29C8EFE1A6DC284BD98D786236DEC3B36A, serialNumber=C2059C619B132F2AED080CA3DBDB2D0B281D001C448626E8CD1555775F3F9647, cn=ABHAY MADHUKAR PIMPARKAR
Date: 2021.10.13 16:48:31 +05'30'

(अभय पिंपरकर)
शा.श्रे.१ तथा उप सचिव
(पर्यावरण व वातावरणीय बदल)

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव, पंचायत राज व ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) अपर मुख्य सचिव, (महसूल), महसूल व वने विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) प्रधान सचिव, (वने), महसूल व वने विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) प्रधान सचिव, पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) सचिव, मदत व पुर्नवसन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, सायन, मुंबई-२२.
१०) अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
११) जिल्हाधिकारी, मुंबई शहर/ मुंबई उपनगर, मुंबई.
१२) अतिरिक्त प्रधान मुख्य वनसंरक्षक, केंद्रीय वन व पर्यावरण मंत्रालय, विभागीय कार्यालय, नागपूर

१३) चीफ वाईल्ड लाईफ वार्डन

१४) सदस्य सचिव, राज्य जैव विविधता मंडळ

१५) संचालक, महाराष्ट्र रिमोट सेंन्सींग सेंटर

१६) श्री.राकेश कुमार, संचालक, निरी, नागपूर.

१७) श्री.दिपक आपटे, बीएनएचएस, मुंबई

१८) श्री.प्रमोद साळस्कर

१९) श्री.कुरुश दलाल

२०) मा.मंत्री, पर्यावरण व वातावरणी बदल विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

२१) मा.राज्यमंत्री, पर्यावरण व वातावरणी बदल विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२